**नागपूर विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये निवडीने नियुक्त्या.**

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
आदेश क्र.: मविसे १०/२०१०/प्र.क्र.९२/आस्था-३ अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : २४ नोव्हेंबर, २०१०.

संदर्भ :- शासन आदेश क्र. मविसे १०/२०१०/प्र.क्र.९२/आस्था-३, दिनांक ४ ऑक्टोबर २०१०

**आदेश**

संदर्भाधीन दि. ४ ऑक्टोबर २०१० च्या आदेशान्वये नागपूर विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील एकूण ११ कर्मचा-यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-ब या संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+४४०० ग्रेडवेतन या वेतनश्रेणीत तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्त्या देऊन पदस्थापना देण्यात आल्या आहेत. सदरहू आदेशातील अ.क्र. ११ येथील श्रीमती अनिता तेलंग यांच्या पदस्थापनेत अंशत: बदल करण्यात येत असून पदोन्नतीनंतर त्यांची पदस्थापना **बालविकास प्रकल्प अधिकारी, जिवती, जि.चंद्रपूर** ऐवजी **बालविकास प्रकल्प अधिकारी, पारशिवनी, जि. नागपूर** या पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी निवडीने नियुक्त झालेल्या उक्त कर्मचा-यास स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत सूचना द्याव्यात. त्यानुसार संबंधिताने पदोन्नतीच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे व पदभार स्वीकारल्यानंतर त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. संदर्भाधीन दि. ४ ऑक्टोबर २०१० च्या आदेशातील परिच्छेद २, ३ व ५ मधील अटी व शर्तीत कुठलाही बदल नाही याची कृपया नोंद घेण्यात यावी.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१०११२४२०४२४२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रि. इ. शेख )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने )
२. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर, चंद्रपूर.
५. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद , नागपूर, चंद्रपूर .
६. संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजन संचालनालय, नवी मुंबई.
७. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य- महाराष्ट्र- २ नागपूर .
८. खाजगी सचिव, मा. मंत्री, (ग्राम विकास )
९. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री.( ग्राम विकास )
१०. सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
११ संबंधित अधिकारी (द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
१२. कार्यासन क्रमांक आस्था-२ / योजना -५ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३ अ, ग्राम विकास व जलसंधारण विभा